**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील सचिव (वस्त्रोद्योग) स्थित असलेल्या कार्यालयीन दालन क्रमांक ३१३ विस्तार मधील दुरुस्ती खर्चास प्रशासकीय मान्यता देणे व निधी वितरित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. दुरुस्ती-२०१८/प्र.क्र.४७४/आस्था-०२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट, २०१८

**संदर्भ** :- (१) कार्यकारी अभियंता,इलाखा शहर, मुंबई-१ यांचे पत्र क्र.इशवि/ प्रशा/द./४३८४, दि.५.४.२०१८
(२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाचे कार्यादेश क्र.दुरुस्ती२०१८/प्र.क्र.४७४/आस्था-२ दिनांक ६.४.२०१८

**प्रस्तावना :-**

मा. सचिव (वस्त्रो.) यांचे कार्यालयीन दालन क्रमांक ३१३ (विस्तार) मध्ये वॉल पॅनलिंग , फॉल सिलिंग, इत्यादी दुरुस्तीची कामे करून घेण्याबाबत मा. सचिव (वस्त्रोद्योग) यांनी निर्देशित केल्यानुसार कार्यकारी अभियंता, मुंबई इलाखा शहर, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई-१, यांचेकडून सदर दुरुस्तीच्या कामाकरिता सादर करण्यात आलेल्या **एकूण रु.३,९८,७४५/- (रुपये तीन लाख अठ्ठयाण्णव हजार सातशे पंचेचाळीस फक्त)** एवढया अंदाजपत्रकीय खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची व निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

या शासन निर्णयान्वये, मा. सचिव (वस्त्रो.) यांचे कार्यालयीन दालन क्रमांक ३१३ (विस्तार) मध्ये वॉल पॅनलिंग, फॉल सिलिंग, इत्यादी दुरुस्तीची कामे करून घेण्याबाबत मा. सचिव (वस्त्रोद्योग) यांनी निर्देशित केल्यानुसार सदर दुरुस्तीची कामे या विभागाचे कार्यादेश क्रमांक दुरुस्ती२०१८/प्र.क्र.४७४/ आस्था-२ दिनांक ५.१२.२०१६ अन्वये कार्यकारी अभियंता, मुंबई इलाखा शहर, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई-१, यांचेकडे सुपूर्द करण्यात आले. याकरिता त्यांचेकडून सादर करण्यात आलेल्या **रु.३,९८,७४५/- (रुपये तीन लाख अठ्ठयाण्णव हजार सातशे पंचेचाळीस फक्त)** एवढया अंदाजपत्रकीय खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त काम समाधानकारकरित्या पूर्ण केल्याबाबतचा अहवाल मा. सचिव (वस्त्रो.) यांचे स्वीय सहाय्यक यांनी दिनांक १ ऑगस्ट, २०१८ रोजी या कार्यासनाकडे सादर केलेला असून त्यास अनुसरून मान्य करण्यात आलेला अंदाजपत्रकीय निधी उपलब्ध करून देण्याबाबत शाखा अभियंता, सा. बां. सेवा केंद्र, मंत्रालय, मुंबई यांनी त्या अहवालावरच विनंती केलेली आहे. त्यास अनुसरून याच शासन निर्णयान्वये, सदर कामासाठी लागणारा **रु.३,९८,७४५/- (रुपये तीन लाख अठ्ठयाण्णव हजार सातशे पंचेचाळीस फक्त)** एवढा निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीद्वारे, आहरण व संवितरण अधिकारी **संकेतांक क्रमांक ७१०१९०३६९६** यांना वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

३. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र. खर्च "मागणी क्र.व्ही-२-३४५१-सेक्रेटरिएट आर्थिक सेवा, (०९०)-सचिवालयीन, ०१ सचिवालयीन आर्थिक सेवा, (०१) (०१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (दत्तमत) (३४५१ ०३०४) १३ कार्यालयीन खर्च " या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१८-२०१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री. र. गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच डॉ. सुदिन गायकवाड , उप सचिव (रोखशाखा), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या ज्ञापनान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग- एक ते पाच प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये सुधारणा करण्याबाबत मधील अनुक्रमांक १६, नियम क्रमांक ६४, अन्वये प्रशासकीय विभागास रु.४.०० लक्ष रकमेच्या मर्यादेपर्यंत प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१०१२१५३०३६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Geeta Hemant Rane

Digitally signed by Geeta Hemant Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bf016eb71db35b2d39a429504722a049bbb0c7289b5d48579124b6b1719e36b8, cn=Geeta Hemant Rane
Date: 2018.08.10 12:17:52 +05'30'

(गी. हे. राणे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. कार्यकारी अभियंता,इलाखा शहर, सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, दुसरा मजला, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई ४०० ००१,

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, ( मुंबई/ नागपूर )
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, ( मुंबई/ नागपूर )
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
५. आहरण व संवितरण अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई-४०००३२
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. निवडनस्ती, आस्था-०२, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई-४०००३२.